नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेने संमत केलेला ठराव क्र. १३४ दि.३०.११.२०१८ अंतिमत: विखंडीत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक:नामपा-२०१९/प्र.क्र.६९/नवि-२४,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक:-१८ ऑगस्ट,२०२३

**संदर्भ** :- १) आयुक्त, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.नावाशमनपा/साप्रवि/१६०५७/२०१८/दिनांक २.२.२०१९
२) आयुक्त, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.नावाशमनपा/साप्रवि/१८२०४/२०१८/दिनांक १५.३.२०१९

**प्रस्तावना** :-

श्री. स. जिलानी सय्यद मौला, शिपाई नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका यांना वैद्यकीय उपचाराच्या कारणास्तव आर्थिक मदत म्हणुन महानगरपालिकेने दि. २.३.२०१५ च्या आदेशान्वये रु. २.५० लाख मंजूर केलेली आहे. सदर मंजूर केलेल्या रकमेपैकी रु. १ लाख श्री.जिलानी यांना अदा करण्यात आलेले आहेत.

२. श्री. जिलानी यांना विशेष बाब म्हणुन मंजूर करण्यात आलेल्या आर्थिक मदतीच्या रकमेपैकी उर्वरित रक्कम रु. १.५० लाख तात्काळ अदा करण्यास सर्वसाधारण सभेने ठराव क्र. १३४ दि. ३०.११.२०१८ संमत केला होता.

३. महानगरपालिकेमधील अधिकारी/कर्मचा-यांना वैद्यकीय प्रतिपुर्तीचा लाभ अनुज्ञेय करण्यासाठी शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग दि. १६.३.२०१६ च्या तरतुदीनुसार सर्वसाधारण सभा ठराव क्र. २० दि. १०.४.२०१८ अन्वये नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेमधील अधिकारी/कर्मचारी यांना वैद्यकीय प्रतिपुर्तीचा लाभ देण्यास मान्यता देण्यात आली. त्यानुसार दि.१.४.२०१८ पासून नांदेड वाघाळा महानगरपालिकेतील अधिकारी/कर्मचारी यांना १३ आकस्मिक व ५ गंभीर आजारावरील उपचाराकरिता वैद्यकीय प्रतिपुर्तीचा लाभ अनुज्ञेय करण्यात आलेला आहे.

४. अंतर्गत लेखा परिक्षक व मुख्य लेखा परिक्षक, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका यांचे अभिप्रायानुसार, महानगरपालिकेमधील अधिकारी व कर्मचारी यांना वैद्यकीय खर्चाची प्रतिपुर्ती योजना दि.१.४.२०१८ पासुन लागू करण्यात आली असल्यामुळे, तसेच श्री. जिलानी यांना आर्थिक मदत मंजूर केल्याबाबतचे प्रकरण हे दि. १.४.२०१८ च्या पुर्वीचे असल्यामुळे उर्वरीत रक्कम त्यांना देता येणार नाही असा अहवाल महानगरपालिका प्रशासनाने सर्वसाधारण सभेसमोर सादर केलेला

होता. तथापि, महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेने सदर अहवाल विचारात न घेता प्रशासकीय अहवालाच्या विरुध्द व विसंगत असा ठराव पारीत केलेला आहे. सदर ठराव क्र.१३४ दि.३०.११.२०१८ हा प्रशासकीय अहवालाच्या विरुध्द असून, संयुक्तीक व सनदशीर ठरत नसल्यामुळे उक्त ठराव हा महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, कलम ४५१ अन्वये विखंडीत करण्यासाठी प्रथमत: कलम ४५१(१) नुसार शासन निर्णय दि.१.८.२०१९ रोजी निलंबित करण्यात आला आहे.

५. तद्नंतर, ठराव क्र.१३४, दि.३०.११.२०१८ हा शासन निर्णय दि.१.८.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये निलंबित केल्यानंतर संबंधितांचे अभिवेदन मागविण्यात आले होते. त्यानुषंगाने त्यांचे कोणतेही अभिवेदन या विभागास प्राप्त झालेले नाही. तसेच श्री.स.जिलानी स.मौला हे दि.८.९.२०२० रोजी मृत्यू पावले असल्याचे आयुक्त, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका यांनी त्यांच्या दि.२३.२.२०२१ रोजीच्या पत्रान्वये कळविले आहे.

६. महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेने संमत केलेला ठराव क्र.१३४, दि.३०.११.२०१८ हा नियमानुसार नसून तसेच महानगरपालिकेच्या प्रशासकीय अहवालाच्या विरुध्द असून, संयुक्तीक व सनदशीर ठरत नसल्यामुळे महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम,१९४९ मधील कलम ४५१(३) मध्ये नमूद केल्याप्रमाणे अंतिमत: विखंडीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केलेल्या वस्तुस्थितीनुसार नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेने संमत केलेला ठराव क्र.१३४, दि.३०.११.२०१८ हा प्रशासकीय अहवालाच्या विरुध्द असून, संयुक्तीक व सनदशीर ठरत नसल्यामुळे, सदर ठराव महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम,१९४९ चे कलम ४५१(३) नुसार अंतिमत: विखंडीत करण्यात येत आहे.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०८१८१५२०४६००२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2023.08.18 15:21:56 +05'30'

**(विद्या हम्पय्या)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. आयुक्त तथा प्रशासक, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका, नांदेड

३. नगर सचिव तथा प्राधिकृत अधिकारी, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका, नांदेड
४. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी,मंत्रालय,मुंबई
५. निवड नस्ती (नवि-२४).